**परभणी पंचायत समिती (जि.परभणी) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१८/प्र.क्र.११८/बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: २४ जानेवारी २०१९

वाचा :-

१) अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प, परभणी यांचे जा.क्र.जिप/ बांध/ताशा/ १४७१/२०१८ दि.२७.०३.२०१८

प्रस्तावना :-

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, परभणी यांनी वरील पत्रान्वये परभणी पंचायती समितीच्या प्रशासकीय इमारती बांधकामास प्रशासकिय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. सदर पंचायत समितीची अस्तित्वातील इमारत जुनी व मोडकळीस आल्यामुळे व धोकादायक स्थितीमध्ये असल्यामुळे तसेच, प्रशासकीय कामाच्या दृष्टीने अपुरी असल्याने कामकाजामध्ये गैरसोयीचे ठरत आहे. त्यामुळे, नवीन प्रशासकिय इमारत बांधकाम करण्याकरीता पंचायत समितीने दिनांक २२.०३.२०१८ रोजी ठराव क्र. ४३ पारित केले आहे. सदर पंचायत समितीची नवीन प्रशासकीय इमारत बांधकाम ७/१२ क्र. ३६५ मधील १२७६ चौ.मी या जागेत प्रस्तावित आहे. सदर पंचायत समिती " ब " वर्गात मोडते. त्यानुसार कार्यकारी अभियंता, (बांधकाम) जिल्हा परिषद, परभणी यांनी पंचायत समिती परभणी नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाकरिता प्रादेशिक वास्तुशास्त्रज्ञ सा.बां.मंडळ औरंगाबाद यांच्याकडील PNB (४)१८/डीआरजी नं-१-९ या नमुन्या नकाशे आधारी पहिला मजला ५८७.३३ चौ.मी., दुसरा मजला ५८७.३३ चौ.मी. व तिसरा मजला ५८७.३३ चौ.मी. असे एकूण १७६१.९९ चौ. मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले आहे. याकरिता एकुण रू.४९९.०७ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अदांजपत्रक सन २०१७-१८ च्या दरसुचीवर आधारीत असून उपअभियंता व कार्यकारी अभियंता,(बांधकाम) जिल्हा परिषद परभणी यांनी सांक्षाकित केले आहे. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांनी प्रस्तावासोबत पं.स.च्या ठरावाची प्रत, नमुना नकाशाची प्रत,जागेचा उतारा, ले आऊट प्लॅन, साईट प्लॅन, लिड चार्ट, क्वारी चार्ट, स्ट्रक्चरल ऑडीट व स्थळ दर्शक नकाशा इत्यादि कागदपत्र सादर केली आहेत.

३. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, परभणी यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती परभणी पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रुपये ४९९.०७ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

४. परभणी पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रुपये ४,९९,०७,०००/- (रुपये चार कोटी नव्याण्णव लक्ष सात हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) नियोजित परभणी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता प्रादेशिक वास्तुशास्त्रज्ञ सा.बां.मंडळ औरंगाबाद यांच्याकडील PNB (४)१८/डीआरजी नं-१-९ या नमुन्या नकाशे आधारीत प्रथम मजला ५८७.३३ चौ.मी, द्वितीय मजला ५८७.३३ चौ.मी व तृतीय मजला ५८७.३३ चौ.मी असे एकूण १७६१.९९ चौ. मी. क्षेत्रफळाच्या बांधकामास मान्यता देण्यात आली असून त्यानुसार इमारतीचे बांधकाम हाती घेण्यापूर्वी स्थानिक नगर रचना प्राधिकरणाची तसेच, अग्निशामन यंत्रणेची मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजित साकोली पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकामाकरीता प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यात पदाधिकारी यांच्या दालनालगत महिला पदाधिकाऱ्यांसाठी प्रसाधनगृहा-सह विश्रांती कक्षाची व्यवस्था करण्यात यावी.

३) प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अमंलात आणुन, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरण पुरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

४) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

६) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध) यांनी दक्षता घ्यावी.

७) या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

८) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

५.	परभणी पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा खालीलप्रमाणे आहे.

| GENERAL ABSTRACT FOR CONSTRUCTION OF PARBHANI P.S.ADMIN.BLDG | | |
|---|---|---|
| Sr.No. | DESCRIPTION OF ITEM | Cost in Rs. |
| 1 | COST OF P.S Building | 32818468.00 |
| 2 | Cost Of Septic Tank | 145199.00 |
| 3 | Electrification | |
| | i) Internal and External 7 % | 2297293.00 |
| | ii) Trance former, MSEB charges | 1000000.00 |
| 4 | Water supply and sanitation 5 % | 1640923.00 |
| 5 | Compound wall and Gate | 500000.00 |
| 6 | Internal Road And Drain | 200000.00 |
| 7 | Soil Investigation 0.05% | 164092.00 |
| 8 | Cost of Demolition of Building | 500000.00 |
| | **Total (A)** | **39265975.00** |
| 8 | Add 2% For Contingencies | 785320.00 |
| | **Total (B)** | **40051295.00** |
| 9 | Add 12% For G.S.Charges | 4806155.00 |
| | **Optional Items Including GST** | |
| 10 | Water Main Storage and Pump house | 250000.00 |
| 11 | Bore well Pump house and Sump well | 500000.00 |
| 12 | Rain Water Harvesting | 500000.00 |
| 13 | Fire Frightening Arrangement | 500000.00 |
| 14 | Flag Post | 300000.00 |
| 15 | Price Escalation 10% on **(A)** | 3000000.00 |
| | **Total (C)** | **9856155.00** |
| | **Total Rs. (B+C)** | **49907450.00** |
| | **SAYS** | **49907000.00** |

६.	उपरोक्त प्रशासकिय इमारत बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७.	या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडुन त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

८.	प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१९०१२३१८००४४६८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.01.24 11:41:23 +05'30'

( दि.बा.पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद परभणी
५) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद परभणी
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद परभणी
७) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, परभणी
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परभणी
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, परभणी
१०) सभापती, पंचायत समिती, परभणी, जिल्हा परभणी
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, परभणी, जिल्हा परभणी
१२) निवड नस्ती, कार्यासन क्र.बांधकाम -४, ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन मुंबई